बृहन्मुंबईतील नागरी संरक्षण दलाच्या भोंगा इशारा प्रणालीचे नवीनीकरण करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग (विशेष)

शासन निर्णय क्र.: एचजीएस २००२/प्र.क्र.७०/विशा.८,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक : ३१ मार्च, २००४.

वाचा :- १) शासन निर्णय, गृह विभाग, क्र.एचजीएम १२००/४२४/प्र.क्र.१८/विशा.८, दिनांक ४.२.२००३.
२) संचालक, नागरी संरक्षण यांचे अर्धशासकीय पत्र क्र.नासंसं/६/४/प्रशि. क्षेत्र.खरेदी/२००४. दिनांक १०.२.२००४.

शासन निर्णय :- नागरी संरक्षण कायदा १९६८ नुसार महाराष्ट्र राज्यात नागरी संरक्षण दलाची स्थापना करण्यात आली आहे. युध्दजन्य परिस्थितीत नागरीकांच्या जिवीत व मालमत्तेची कमीत कमी हानी व्हावी. म्हणून धोक्याची पूर्वसूचना देण्यासाठी बृहन्मुंबई नागरी संरक्षण दलामध्ये भोंगा इशारा प्रणाली बसविली असून सदर भोंगा इशारा प्रणालीचे नवीनीकरण करण्यासाठी शासनाने घेतलेल्या निर्णयास अनुसरुन भोंगे, विद्युतसंच मांडणी (स्टार्टर, स्विच, केबल इ.) च्या नवीनीकरणासाठी लागणाऱ्या रु.१,६३,००,०००/- रकमेपैकी रु.१,५०,००,०००/- इतकी रक्कम खर्च करण्यास व सदर रक्कम मुख्य अभियंता (विद्युत), सार्वजनिक बांधकाम विभाग, चेंबूर, मुंबई यांच्याकडे सुपूर्द करण्यास संदर्भाधीन शासन निर्णय, गृह विभाग, दिनांक ४ फेब्रुवारी, २००३ अन्वये मंजूरी देण्यात आलेली आहे. उर्वरित (अ) भोंगा व त्याला संलग्न यंत्रणा करिता रु.१३,००,०००/- इतकी रक्कम मंजूर करण्याचा तसेच (ब) १०% राखीव भोंगे खरेदी करण्यासाठी रु.४३,००,०००/- इतकी रक्कम मंजूर करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्यानुसार (अ) भोंगा व त्याला संलग्न यंत्रणा करिता रु.१३,००,०००/- इतकी रक्कम मंजूर करण्यास तसेच (ब) १०% राखीव भोंगे खरेदी करण्यास व त्यासाठी रु.४३,००,०००/- रकमेच्या खर्चास शासन मंजूरी देत आहे. तसेच सदरहू रु.१३,००,०००/- आणि रु.४३,००,०००/- मिळून एकूण रु.५६,००,०००/- (रुपये छप्पन्न लक्ष फक्त) ही रक्कम १५ फेब्रुवारीनंतरच्या खरेदीवरील निर्बंध शिथील करण्यास व १००% रक्कम खर्च करण्यास आणि मुख्य अभियंता (विद्युत) सार्वजनिक बांधकाम विभाग, चेंबूर, मुंबई यांच्याकडे सुपूर्द करण्यास एक विशेष बाब म्हणून शासन मंजूरी देत आहे.

२. हा खर्च "२०७०-इतर प्रशासनिक सेवा-१०६-नागरी संरक्षण (०३) राज्य नागरी संरक्षण संघटना" या लेखाशिर्षाखाली दर्शविण्यात यावा व तो सन २००३-०४ च्या चालू आर्थिक वर्षामध्ये हिवाळी अधिवेशनात मंजुर करण्यात आलेल्या रु.२,४५,५२,०००/- रकमेच्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांच्या अर्थोपाय शाखेच्या सहमतीने अनुक्रमे अनौपचारिक संदर्भ क्र. सीआर-२७०/२००४/व्यय-८ व क्रमांक.६७२/अर्थोपाय, दिनांक ३१.३.२००४ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( बि. आर. घवाले )
कार्यासन अधिकारी, गृह विभाग (विशेष), महाराष्ट्र शासन.

प्रति,

संचालक, नागरी संरक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
महालेखापाल, महाराष्ट्र-१ / २ (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरिक्षा), मुंबई / नागपूर.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
वित्त विभाग (व्यय-८), (अर्थोपाय), मंत्रालय, मुंबई
मुख्य अभियंता (विद्युत), सार्वजनिक बांधकाम विभाग, ३ रा मजला, रामकृष्ण चेंबूरकर मार्ग, चेंबूर (पूर्व), मुंबई ४०० ०७१.
गृह विभाग, बीयुडी-१, मंत्रालय, मुंबई-३२.